**आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी करुन राज्याचे नाव उज्ज्वल केलेल्या महाराष्ट्र राज्यातील पदक प्राप्त खेळाडू व त्यांच्या मार्गदर्शकांना रोख पारितोषिक देऊन गौरविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राक्रीधो-३६२२/प्र.क्र.५९(भाग-१)/क्रीयुसे-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २४ फ़ेब्रुवारी, २०२५

**वाचा:**

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : क्रीडायो २०१२ / प्र.क्र १५८/१२/क्रीयुसे - २, दि.०५.०२.२०१४.

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक : राक्रीधो-३६२४/ प्र.क्र.५९/ क्रीयुसे-२, दि.०७.१०.२०२४

३) सह संचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र. आं.खेरो.पा. /आंखेरोब/सुधारणा प्रस्ताव/ २०२४-२५ /का-६ /२४०९, दि. १०.१०.२०२४.

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र राज्याचे क्रीडा धोरण, २०१२ अंतर्गत आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी केलेल्या तसेच राज्याचे नाव उज्ज्वल करणा-या पदक प्राप्त खेळाडू व त्यांच्या मार्गदर्शकांना रोख पारितोषिक देऊन गौरविण्याची योजना दि.०५.०२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये कार्यन्वित आहे. ऑलिम्पिक/पॅरा ऑलिम्पिक क्रीडा स्पर्धा व आशियाई/पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धेतील पदक विजेत्या खेळाडूंना इतर राज्यांमार्फत भरघोस मदत दिली जाते. त्याच धर्तीवर आंतरराष्ट्रीय स्तरावर विविध स्पर्धांमध्ये उल्लेखनीय कार्य करुन राज्याचे नाव उज्ज्वल करणाऱ्या खेळाडूंना प्रोत्साहन देण्यासाठी राज्यातील आंतरराष्ट्रीय पदक प्राप्त खेळाडू व त्यांचे क्रीडा मार्गदर्शक यांना रोख पारितोषिक देवून गौरविण्याच्या योजनेत कॅबिनेट मध्ये घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने दिनांक ०७ ऑक्टोबर, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार हँगझोऊ, चीन येथे सपंन्न झालेल्या पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धा, २०२२ स्पर्धेतील आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी करुन राज्याचे नाव उज्ज्वल केलेल्या महाराष्ट्र राज्यातील पदक प्राप्त खेळाडू व त्यांच्या मार्गदर्शकांना रोख पारितोषिक देऊन गौरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

हँगझोऊ, चीन येथे संपन्न झालेल्या पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धा, २०२२ स्पर्धेत आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी करुन राज्याचे नाव उज्ज्वल केलेल्या महाराष्ट्र राज्यातील पदक प्राप्त खेळाडू व त्यांच्या मार्गदर्शकांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेली रक्कम रोख पारितोषिक म्हणून मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे-:

| अ. क्र. | खेळाडूचे नाव व पत्ता | खेळ | स्पर्धा | प्राविण्य | प्रस्तावित रक्कम (लाखात) | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | खेळाडू | मार्गदर्शक |
| १ | श्रीमती मानसी जोशी | पॅरा बॅडमिंटन | पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धा २०२२, हँगझोऊ, चीन | कांस्य | ५०.०० | ५.०० |
| | | | | सांघिक रौप्य | ५६.२५ | ५.६२५ |
| २ | श्री.सुकांत कदम | पॅरा बॅडमिंटन | पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धा २०२२, हँगझोऊ, चीन | कांस्य | ५०.०० | ५.०० |
| | | | | सांघिक कांस्य | ३७.५० | ३.७५ |
| ३ | श्री सचिन खिलारी | पॅरा ॲथलेटिक्स | पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धा २०२२, हँगझोऊ, चीन | सुवर्ण | १००.०० | १०.०० |
| ४ | श्रीम भाग्यश्री जाधव | पॅरा ॲथलेटिक्स | पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धा २०२२, हँगझोऊ, चीन | रौप्य | ७५.०० | ७.५० |
| ५ | श्री. दिलीप गावीत | पॅरा ॲथलेटिक्स | पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धा २०२२, हँगझोऊ, चीन | सुवर्ण | १००.०० | १०.०० |
| ६ | श्री आदिल अन्सारी | पॅरा आर्चरी | पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धा २०२२, हँगझोऊ, चीन | सांघिक कांस्य | ३७.५० | ३.७५ |
| ७ | श्री सुयश जाधव | पॅरा जलतरण | पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धा २०२२, हँगझोऊ, चीन | कांस्य | ५०.०० | ५.०० |
| ८ | श्रीम संस्कृती मोरे | पॅरा बुध्दीबळ | पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धा २०२२, हँगझोऊ, चीन | सांघिक कांस्य | ३७.५० | ३.७५ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ९ | श्री. आर्यन जोशी | पॅरा बुध्दीबळ | पॅरा आशियाई क्रीडा स्पर्धा २०२२, हँगझोऊ, चीन | सांघिक कांस्य | ३७.५० | ३.७५ |
| | | | | **रक्कम** | ६३१.२५ | ६३.१२५ |
| | | | | **एकूण रक्कम** | ६९४.३७५ | |

उपरोक्त नुसार एकूण रु. **६९४.३७५** लक्ष ( रु. सहा कोटी चौ-याण्णव लक्ष सदतीस हजार पाचशे फक्त ) इतकी रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त बाबीकरीता होणारा खर्च "मागणी क्रमांक ई-३,२२०४- क्रीडा व युवक सेवा १०४ क्रीडा व खेळ (०९) (०६) ऑलिम्पिक, राष्ट्रकुल व आशियाई स्पर्धांमधील पदक विजेत्यांना रोख पारितोषिक देणे (२२०४-५३२१)- ५० इतर खर्च" या लेखाशीर्षाखालील अर्थसंकल्पित तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

I उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार व मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आहरित करावा. शासन लेख्याबाहेर बॅक खात्यात हा निधी ठेवू नये.

ii राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश / नियम /शासन निर्णय, वित्तीय नियमावली करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतुद वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

ii उपरोक्त कार्यक्रमानंतर खर्चाचा सविस्तर तपशिल तात्काळ सादर करावा.

४. वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार वरील निधी खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विगाभाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६२(अ)/१४७१, दि.३१.०१.२०२५ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१८९/व्यय-५,दि.०७.०२.२०२५ अन्वये प्राप्त तरतुदीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२४१७२२२२४५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by ASHOK HANMANLU DAMAYYAWAR
Date: 2025.02.24 17:23:24 +05'30'

**(अशोक ह दमय्यावार)**
**अवर सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन, राज्य उत्पादन शुल्क) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास, गृहनिर्माण, सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
७) मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय
८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) अपर मुख्य सचिव, क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
१२) महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१/२,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१६) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
१७) वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई-३२.
१८) अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९) निवड नस्ती (क्रीयुसे-२).